**मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता रू.१२३.३८ कोटी निधी उपलब्ध करून देणेबाबत...**

## महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुसिंयो-२०२२/प्र.क्र.१५३/१४-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च , २०२३

**संदर्भ :**

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. कोशाशे-४२१८/प्र.क्र.८६/८अे दि. १९ ऑगस्ट,२०१९.
२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. प्रकृसिं-०६१९/प्र.क्र.१६४/१४-अे दि. १८ नोव्हेंबर,२०२१.
३. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०४ एप्रिल, २०२२.
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. शाशेअ-२०२२/प्र.क्र.१५३/१४-अे दि. २७ जुलै, २०२२.
५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. शाशेअ-२०२२/प्र.क्र.१५३/१४-अे दि. २१ सप्टेंबर, २०२२
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. शाशेअ-२०२२/प्र.क्र.१५३/१४-अे दि. १२ जानेवारी, २०२३.
७. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. शाशेअ-२०२२/प्र.क्र.१५३/१४-अे दि. १७ मार्च, २०२३.
८. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. पुनर्वि -२०२२/प्र.क्र.१३१ /२-अे, दि. ३१ मार्च, २०२३

**प्रस्तावना :**

राज्यातील शेतकऱ्यांना शाश्वत सिंचनाची सोय उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने अवर्षणप्रवण क्षेत्र तसेच आत्महत्याग्रस्त व नक्षलग्रस्त जिल्ह्यात मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना राबविण्यास दि.१९ ऑगस्ट,२०१९ रोजीच्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली असून सदर योजना राज्यातील उर्वरित तालुक्यांमध्ये देखील राबविण्याचा निर्णय शासनाने दि. १८ नोव्हेंबर,२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेतला आहे.

प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत राज्यातील अल्प व अत्यल्प भू- धारक शेतकऱ्यांना ५५% आणि इतर शेतकऱ्यांना (५ हेक्टरच्या मर्यादेत) ४५% अनुदान देण्यात येते. सदर अनुज्ञेय अनुदानाशिवाय "मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन" योजनेंतर्गत अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांना २५ % आणि इतर शेतकऱ्यांना ३०% पूरक अनुदान देऊन सूक्ष्म सिंचनासाठी अनुक्रमे ८०% व ७५% एकूण अनुदान देण्यात येते.

मुख्यमंत्री शाश्वत सिंचन योजनेच्या अंमलबजावणीस सन २०१९-२० पासून सुरूवात झाली आहे. तथापि, कोव्हीड-१९ मुळे उद्भवलेल्या आर्थिक परिस्थितीमुळे या योजनेसाठी सन २०१९-२० व

सन २०२०-२१ मध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेला निधी योजनेच्या अंमलबजावणीसाठी उपलब्ध होऊ शकला नाही. त्यामुळे सन २०१९-२० व सन २०२०-२१ मधील प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक घटकांतर्गत सूक्ष्म सिंचन योजनेच्या लाभार्थ्यांना पूरक अनुदानाचा लाभ देणे प्रलंबित होते त्याकरिता रु.३३३.३८ कोटी निधीची आवश्यकता होती.

मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेच्या सन २०१९-२० व सन २०२०-२१ मधील लाभार्थ्यांचे मागील दोन वर्षापासून प्रलंबित असलेल्या उपरोक्त पूरक अनुदानापैकी रु. १५० कोटी निधी व रु.६० कोटी निधी संदर्भ क्र. ६ व ७ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला असून उर्वरित रु.१२३.३८ कोटी निधी वितरित करणे बाकी आहे.

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता सन २०१९-२० व सन २०२०-२१ मधील प्रलंबित दायित्व विचारात घेऊन मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेकरिता रु. ६००.०० कोटींची मूळ अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली होती. त्यानुसार वित्त विभागाच्या दि. ४ जून, २०२२ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार अर्थसंल्पीय तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेस रु. ३६० कोटी निधीच्या कार्यक्रमास संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिताच्या सुधारित अंदाजांत सदर योजनेकरिताची मूळ अर्थसंकल्पीय तरतूद कमी करुन रु. ४४४ कोटी केलेली आहे. त्यामुळे योजनेकरिता यापूर्वी संदर्भ क्र. ४ ते ७ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला रु. ४२० कोटी निधी विचारात घेता मंजूर सुधारित अंदाजांपैकी उर्वरित रु.२४.०० कोटी व संदर्भ क्र. ८ येथील शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करून दिलेला रु. ९९.३८ कोटी निधी असा एकूण रु.१२३.३८ कोटी निधी वितरित करण्याची व त्यानुसार मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेकरिता सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२२-२३ मध्ये मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना या योजनेच्या अंमलबजावणीसाठी वितरीत तरतूदीच्या मर्यादेत रु.५४३.३८ कोटी (रुपये पाचशे त्रेचाळीस कोटी अडतीस लाख फक्त) निधीच्या कार्यक्रमास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत सूक्ष्म सिंचनासाठी मंजूर अनुदानास पूरक अनुदान देण्याची बाब मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेत समाविष्ट असून त्याअंतर्गत सन २०१९-२० व सन २०२०-२१ मधील निवड झालेल्या लाभार्थ्यांचे प्रलंबित पूरक अनुदान वितरीत करण्यासाठी आवश्यक रु. १२३.३८ कोटी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ च्या मंजूर तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र. डी-३,
२४०१, पिक संवर्धन,
(००)(२२) मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजना,
(सर्वसाधारण)(कार्यक्रम),
३३, अर्थसहाय्य,
(२४०१ बी०७२)

४. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना प्रधान मंत्री कृषि सिंचन योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे व संदर्भ क्र. ४ अन्वये दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी सन २०१९-२० व सन २०२०-२१ मधील सूक्ष्म सिंचन संच बसविलेल्या लाभार्थ्यांना पूरक अनुदान वितरीत करण्याकरिता तात्काळ विनियोगात आणावा.

६. या शासन निर्णयान्वये वितरीत निधी कोषागारातून आहरित करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रक अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. मुख्यमंत्री शाश्वत कृषि सिंचन योजनेंतर्गत वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) यांनी शासनास सादर करावे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौ. सं. क्र. १०४/२३/व्यय-१, दि. ३१ मार्च, २०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३११४०४२९७००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by KARAD SANTOSH BANSIRAO
Date: 2023.03.31 14:10:34 +05'30'

**(संतोष ब. कराड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,

५. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,

६. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,

७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे,

८. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे,

९. विभागीय कृषि सह संचालक (सर्व),

१०.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे

११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई,

१२.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,

१३.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई /नागपूर,

१४. वित्त विभाग (व्यय १/अर्थसंकल्प १३), मंत्रालय, मुंबई,

१९.नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई,

२०.निवडनस्ती (कार्यासन १४-अ).